**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत- शहीद जवान शिपाई गणेश किसन ढवळे, जि. सातारा.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१७/ प्र. क्र. ७९ (५) /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २९.०३.२०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१६/प्र.क्र.९२(१) २०१६/२८, दिनांक ३०.११.२०१६

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/ढवळे/सैकवि-१६/९२४, दि. १०/०३/२०१७

**शासन निर्णय-**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या सैनिकांच्या वारसांना/अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील अधिकारी /जवानांच्या विधवांना/ कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक ३०.११.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक मदत देण्यात येते धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या बाबतीत देय असलेली आर्थिक मदतीची विभागणी खालीलप्रमाणे विभागून देण्यात येते.१) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर अ) त्यांची वीरपत्नी- ६० टक्के, ब) वीरमाता- २० टक्के, वीरपिता- २० टक्के क) त्यांचे आई-वडीलांपैकी आई किंवा वडील हयात असल्यास त्यांना ४० टक्के, २) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्याची वीरपत्नीला १०० टक्के ३) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर त्याचे आई-वडील यांच्यामध्ये समान विभागणी करुन ४) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्यांचे भाऊ/बहीण यांच्यामध्ये समान विभागणी करुन याप्रमाणे विभागणी करण्यात येते.

सैनिक कल्याण विभागाने दिनांक १०/०३/२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या विधवा / अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**(शासन निर्णय क्र.मासैम २०१६/प्र.क्र.९२(१) २०१६/२८, दिनांक ३०.११.२०१६ अन्वये धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवा/ अवलंबितांना आर्थिक मदत)**

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| २८०८९५९ एम शिपाई **गणेश किसन ढवळे,** मु. पो. आसरे, ता. वाई, जि. सातारा. | ३० जानेवारी, २०१७ माछल सब सेक्टर,कुपवाडा(जम्मु- कश्मिर) ऑपरेशन रक्षक | १. श्रीमती रेश्मा गणेश ढवळे, (वीरपत्नी) रु.४.८०लाख<br>२. सौ. राधाबाई किसन ढवळे, (वीरमाता) रु. १.६० लाख<br>३. श्री. किसन भाऊ ढवळे ( वीरपीता) रु. १.६० लाख मु. पो. आसरे, ता. वाई, जि. सातारा |
| | **एकूण** | **रुपये ८.०० /- लक्ष** |

२. धारातीर्थी पडलेल्या जवानांना अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी २० % म्हणजे रु. १,६०,०००/- ( रु. एक लक्ष साठ हजार फक्त) प्रमाणे शासकीय अनुदानातून तर उर्वरित ८० % रक्कम म्हणजे रुपये ६,४०,०००/- ( रु. सहा लक्ष चाळीस हजार फक्त ) प्रमाणे मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रु.४२,२१,७२,०००/- कोटी रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. १,६०,०००/- (रुपये एक लक्ष साठ हजार फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत/ सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर रु. ४९,२०,०००/- (रुपये एकोणपंन्नास लाख वीस हजार फक्त)इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, **सातारा** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१६/प्र.क्र.९२(१) २०१६/२८, दिनांक ३०.११.२०१६ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१२१२४३६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.03.30 12:14:39 +05'30'

**( कि. म. जकाते )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, **सातारा,**
६. जिल्हा कोषागार अधिकारी, **सातारा,**
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, **सातारा,**
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीमती रेश्मा गणेश ढवळे, (वीरपत्नी) मु. पो. आसरे, ता. वाई, जि. सातारा,
११. सौ. राधाबाई किसन ढवळे, (वीरमाता) मु. पो. आसरे, ता. वाई, जि. सातारा,
१२. श्री. किसन भाऊ ढवळे ( वीरपीता) मु. पो. आसरे, ता. वाई, जि. सातारा,
१३. निवडनस्ती (२ प्रती).